**जेट्टीच्या बांधकामाकरिता केंद्राचे सहाय्य (सागरमाला) (३०५१ १८९१) या योजनेअंतर्गत सन २०२१-२२ मध्ये मंजूर अर्थसंकल्पीत निधीपैकी रू.६२.१३८ कोटी इतका निधी खर्च करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीजीटी ०७२१/प्र.क्र.६९/बंदरे-२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक:- ०३ डिसेंबर, २०२१

**संदर्भ:**-१.महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाचे पत्र क्र.ममेबो/मुकाअ/अभि/निधी वितरण प्रस्ताव/३०५१ १८९१/२०२१-२२/२७८६, दि.१५.०७.२०२१
२.महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाचे पत्र क्र.ममेबो/मुकाअ/ अभि/निधी वितरण प्रस्ताव/३०५१ १८९१/२०२१-२२/३४३७ दि.२४.०८.२०२१
३.शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि.१६.०४.२०२०
४.शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि.०४.०५.२०२०
५.शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं.-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.०६.०४.२०२१
६. महाराष्ट्र मेरीबोर्डाचे पत्र क्र.ममेबो/ मुकाअ/ अभि/निधी वितरण प्रस्ताव/३०५१ १८९१/ २०२१-२२/ ४४८८ दि.०३.११.२०२१

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडून राबविण्यात येणाऱ्या "जेट्टीच्या बांधकामाकरिता केंद्राचे सहाय्य (सागरमाला)" या योजनेकरीता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षामध्ये अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या रु.१११.०८ कोटीपैकी ६० टक्केच्या मर्यादेत रु.६२.१३८ कोटी इतका निधी खालील १५ कामांसाठी खर्च करण्यास मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांना मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नाव | अंदाजपत्रकिय किंमत | सन २०२१-२२ करिता आवश्यक निधी | सन २०२१-२२ करिता ६०% च्या मर्यादेत आवश्यक निधी. |
|---|---|---|---|---|
| १. | काशिद ता. मुरुड येथे पर्यटन दृष्टया जेट्टी विकसीत करणे. | ११२.४६ | ३१.२८ | २५.२७३ |
| २ | बेलापूर ता. जि.ठाणे येथे पर्यटनदृष्टया जेट्टी विकसीत करणे. | ८.३८ | १.१९ | १.१९ |
| ३. | करंजा ता. उरण येथील रो-रो जेट्टीपर्यंत रस्ता तयार करणे | ९.६८ | २.४२ | २.४२ |
| ४ | आंबडवे (शिगवण) मा. मंडणगड जि. रत्नागिरी येथे जेट्टी व पोचररस्त्याचे काम करणे | ७.९० | ३.९५ | ३.९५ |
| ५ | रेवस, ता. अलिबाग, जि.रायगड येथे रो-रो जेट्टी तत्सम सुविधा निर्माण करणे | २५.०७ | १२.५४ | ६.२६ |
| ६ | खारवाडेश्वरी जि.पालघर येथे रो-रो जेट्टीला पोचमार्ग बांधणे | १५.०० | २.१३ | २.१३ |
| ७ | घोडबंदर येथे प्रवासी जेट्टी बांधणे. | ७.५० | ०.१६५ | ०.१६५ |
| ८ | मनोरी, जि. मुंबई उपनगर येथे रो-रो जेट्टी बांधणे. | ६.५९ | १.१५ | १.१५ |
| ९ | बोरिवली, जि. मुंबई उपनगर येथे रो-रो जेट्टी बांधणे | १५.४७ | ३.३७ | ०.०० |
| १० | मालवण ता. मालवण येथे प्रवासी जेट्टी बांधणे १०.२३ ०.७६ ०.७६ | १०.२३ | ०.७६ | ०.७६ |
| ११ | नारिंगी ता. वसई जि.पालघर येथे रो-रो जेट्टी बांधणे | ६.७५ | ०.१९ | ०.१९ |
| १२ | खारवाडेश्वारी जि. पालघर येथे रो-रो जेट्टी बांधणे | १२.९२ | २.७३ | ०.०० |
| १३ | वसई जि. पालघर येथे रो-रो जेट्टी बांधणे | ६.७४ | १.१९ | १.१९ |
| १४ | नारिंगी ता. वसई जि. पालघर येथे रो-रो जेट्टीला पोचमार्ग बांधणे | २९.९१ | १४.९६ | १४.९६ |
| १५ | अर्नाळा किल्ला, ता.वसई जि. पालघर येथे रो-रो जेट्टी बांधणे. | १०.०० | ५.०० | २.५० |
| | **एकूण** | **२८४.६०** | **८३.०२५** | **६२.१३८** |

२. सदर निधी ज्या कामांकरीता वितरीत करण्यात येत आहे, त्याच कामांवर प्राप्त प्रशासकीय मान्यता /सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व विहित कालावधीत खर्ची पडेल, याबाबत आवश्यक ती दक्षता घेण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांची राहील.

३. सदर निधी खर्च करतांना वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१६.०४.२०२० व दि.०४.०५.२०२० च्या परिपत्रकातील सूचनांचे व तरतुदीचे पालन करण्यात यावे. तसेच, सदरचा निधी कोणत्याही परिस्थितीत खर्च न होता बँक खात्यात, स्वीय प्रपंजी खात्यात अथवा शासकिय लेख्याबाहेर ठेवता येणार नाही.

४. सदरचा निधी दि.३१.०३.२०२२ पूर्वी खर्च करून खर्चाची उपयोगीता प्रमाणपत्रे शासनास सादर करण्यात यावी.

५. या वितरीत करावयाच्या तरतुदीकरीता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून लेखाधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड तसेच नियंत्रक अधिकारी म्हणून मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड हे राहतील.

६. यासाठी होणारा खर्च "मागणी क्र. बी-७, ३०५१- बंदरे व दिपगृहे ०२, लहान बंदरे, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना सहाय्य, (००) (०३) जेट्टीच्या बांधकामाकरिता केंद्राचे सहाय्य (सागरमाला). (कार्यक्रम) ३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान (३०५१ १८९१)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा.

७. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या दि.०६.०४.२०२१ च्या शासन परिपत्रकातील अटींची पूर्तता होत असल्याची खात्री करण्यात आली आहे. यापूर्वी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास अदा करण्यात आलेला रू.१९.७२ कोटी निधी १०० टक्केच्या मर्यादेत खर्च झाल्याबाबतचे उपयोगीता प्रमाणपत्र संदर्भाधीन दि.२४.०८.२०२१ च्या पत्रान्वये महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाने सादर केलेले आहे.

८. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.११८/२०२१/ का.१४६१ दि.०७.१०.२०२१ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.४११/२०२१/व्यय-८, दि.२५.१०.२०२१ नुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२११२०३१४४७१३४४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhikan Onkar Thakur

Digitally signed by Bhikan Onkar Thakur
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cb64a92ffb1a1fc675b87b99d133c8e4ffed848f8ec9727d5082eb07dbbe3343, pseudonym=275A9F330CC9FDA3AC47ABC11C0D5C541DE78A2F, serialNumber=2CF77A3A2916BE200D3D9A0961DF4F9F77CC14E167C7FCEC2EA903E779A2239A, cn=Bhikan Onkar Thakur
Date: 2021.12.03 14:51:46 +05'30'

**( भि. ओं. ठाकूर )**

**कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई.

२) वित्त विभाग (व्यय-८/अर्थसंकल्प-११), मंत्रालय, मुंबई-३२.

३) नियोजन विभाग (का. १४६१), मंत्रालय, मुंबई-३२.

४) प्रधान सचिव (बंदरे), गृह विभाग.

५) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई

६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

८) कार्यासन अधिकारी, बीयुडी-१, गृह विभाग.

९) निवडनस्ती (बंदरे-२).